# प्राकृत पद्यात्मक सर्वपूजा.



मूळ संस्कृतावरून

रचणार- भालचंद्र शंकर देवस्थळी.




पब्लिशर- तुकाराम जावजी, | निर्णयसागर प्रेस, नं. २३
प्रिन्टर- बी. आर. घाणेकर, | कोलभाट लेन, मुंबई.

सन १९१२. ] किंमत एक आणा. [ आवृत्ति २ री.

# प्रस्तावना.

श्लोक.

सारूनि दूर शत उद्यम अन्न सेवीं,
स्नाना करीं दशशत त्यजुनीहि तेवीं; ।
दानासि साधि, असती जरि लक्ष कामें,
टाकूनि कोटि मनुजा! भज रामनामें. ॥

प्रतिदिवशीं आपल्या आराध्यदेवतेचें, व जयंत्यादि उत्सवप्रसंगीं त्या त्या विशिष्ट देवतेचें पूजन करणें हा आम्हां आर्यांचा सांप्रदाय आहे. हें पूजन कोणी स्वतः करतात तर कोणी ब्राह्मणद्वारा करवितात. परंतु पूजा करणाऱ्यांना, त्यांतूनही विशेषतः स्त्रीवर्गाला, पूजाप्रसंगीं म्हटले जाणारे मंत्रांचे अर्थाचें ज्ञान नसल्याकारणानें असल्या पूजनापासून व्हावा तसा आनंद होत नाहीं. हल्लींचा काळ शिक्षणप्रसाराचा असल्यामुळें अर्थातच पूजादिप्रसंगीं आपण तोंडानें जें जें कांहीं म्हणत असतों त्याचा वास्तविक अर्थ समजून घेण्याकडे लोकांच्या मनाची प्रवृत्ति व्हावी हें उघड आहे. ही लोकांची इच्छा अंशतः पूर्ण करण्याच्या इच्छेनें पुराणोक्त सर्वपूजेचें हें प्राकृत पद्यात्मक भाषांतर करून लोकांपुढें ठेविलें आहे. तें त्यांच्या आदरास पात्र झाल्यास लेखकास मोठी धन्यता वाटेल.

आर्या.

संस्कृत असो, असो वा प्राकृत, हरि पूजनीं सुखा लाहे, ।
पाहे बुध मौक्तिकगुण, कांचनकार्पासगुण न तो पाहे. ॥

भा. शं. देवस्थळी.

# सर्वपूजा.

## (प्राकृत.)

श्रीगणेशाय नमः ॥ केशवाय नमः, नारायणाय नमः, माधवाय नमः, गोविंदाय०, विष्णवे०, मधुसूदनाय०, त्रिविक्रमाय०, वामनाय०, श्रीधराय०, हृषीकेशाय०, पद्मनाभाय०, दामोदराय०, संकर्षणाय०, वासुदेवाय०, प्रद्युम्नाय०, अनिरुद्धाय०, पुरुषोत्तमाय०, अधोक्षजाय०, नारसिंहाय०, अच्युताय०, जनार्दनाय०, उपेंद्राय०, हरये०, श्रीकृष्णाय नमः ॥

(यानंतर श्रीमन्महागणाधिपति, श्रीलक्ष्मीनारायण, शंकरपार्वती, इंद्रइंद्राणी, मातापितर, इष्टदेवता, कुलदेवता, ग्रामदेवता, स्थानदेवता, वास्तुदेवता, सर्व देव, सर्व ब्राह्मण व सूर्यादि नवग्रहांचें चिंतन करून त्यांस नमन करावें, व 'अविघ्न असो' म्हणून त्यांची प्रार्थना करावी.

### संकल्प. (अनुष्टुब् वृत्त.)

'[1]एकदंता ! सुवदना ! कपिला ! गजकर्णका ! ।
लंबोदरा ! गणाध्यक्षा ! विकटा ! विघ्ननाशका ! ॥ १ ॥
गणाधिपा ! धूम्रकेतो ! भालचंद्रा ! गजाननां !' ।
ऐसें गणेशा भजती विघ्नबाधा न त्या जनां. ॥ २ ॥
विद्यारंभीं, विवाहीं त्यां, प्रवेशीं, निर्गमीं[2], तसें, ।
संग्रामांत, विपत्तींत, विघ्न केव्हां न येतसे. ॥ ३ ॥

---

१ हीं गणपतीचीं बारा नांवें आहेत. २ बाहेर जातांना.

चतुर्भुजा, शुक्लवस्त्रा, शशिवर्णा, सुरेश्वरा, ।
सर्वविघ्नोविनाशार्थं प्रसन्नवदना स्मरा. ॥ ४ ॥

नमितों अर्थसिद्ध्यर्थ सर्वमंगलहेतुला, ।
शरण्ये! त्र्यंबके! गौरि! नारायणि! शिवे! तुला. ॥

चित्तांत नित्य जे ध्याती मंगलायतना हरी, ।
तयांच्या सर्वकार्यीं तो सर्व विघ्नें क्षणें हरी. ॥ ६ ॥

( वसंततिलका. )

तेथें सुलग्न, दिन कीं शुभ तेथ आहे, ।
तारावला, शशिबलाम्हि तेथ पाहे ॥
विद्या, सुदैवबल हींही तिथें रहाती, ।
चित्ता जिथें हरिपदीं जन ते वहाती. ॥ ७ ॥

( अनुष्टुब् वृत्त. )

लाभा पावे, जया पावे, हो न दुष्कीर्तिभाजन, ।
ज्याच्या इंदीवरश्याम चित्तीं नित्य जनार्दन. ॥ ८ ॥

( उपजाति. )

विनायकातें, गुरुतें, रवीतें, ।
श्रीशंकरातें, हरितें, विधीतें, ॥
सरस्वतीतें नमिलें सुभावें, ।
कीं कार्यसिद्धी मज हो स्वभावें. ॥ ९ ॥

( अनुष्टुब् वृत्त. )

जो ईप्सितांच्या सिद्ध्यर्थ पूजिलासे सुरासुरीं, ।
गणाधिपा, विघ्नहरा, तयातें नमना करीं. ॥ १० ॥

१ सर्व विघ्नांच्या नाशाकरितां. २ शरण जाण्यास योग्य. (संबोधन.) ३ मं
लाचें—कल्याणाचें—स्थान अशा विष्णूला. ४ हरण करितो. ५ दुष्कीर्तीचें पात्र
स्थान. ६ इंदीवर कमलाप्रमाणें निळ्या वर्णाचा. ७ सूर्याला. ८ ब्रह्मदेवाल
९ भक्तांनें. १० इच्छित वस्तूंच्या. ११ देवांनीं व दैत्यांनीं.

आरब्धसर्वकार्यांत देव त्रिभुवनेश्वर, ।
देवोत सिद्धिला नित्य ब्रह्मा, विष्णु, महेश्वर.॥ ११ ॥

येथें कल्प, मन्वंतर, युग, चरण, देश, अवतार, शक, संवत्सर, अयन, ऋतु, मास, पक्ष, तिथि, दिवस इत्यादिकांचा उच्चार करून 'आज पुराणोक्त फलप्राप्तीकरितां, आपल्या कुटुंबाचें, आपल्या परिवाराचें कल्याण व्हावें, सर्वांस आयुरारोग्य प्राप्त व्हावें, सर्वांची अभिवृद्धी व्हावी, समस्त मंगलांची प्राप्ती व्हावी, म्हणून अमुक (येथें देवतेचें नांव घ्यावें) देवतेचें यथाशक्ति (ध्यानावाहनादि सोळा प्रकारांनीं) पूजन करीत आहें' असें नमस्कारपूर्वक म्हणावें. (पूजा करणारी स्त्री असल्यास तिनें 'ह्या व अन्यजन्मीं अखंड सौभाग्य, पुत्रपौत्रादिप्राप्ति व इतर मनकामना सिद्धीस जाव्या म्हणून हें पूजन करीत आहें' असें देशकालादिकांच्या उच्चारानंतर म्हणावें.) नंतर निर्विघ्नतासिद्ध्यर्थ महागणपतिपूजन व नंतर कलशपूजन, शंखादिपूजन करावें.

**गणपतिपूजन[२]. (अ. वृत्त.)**

वक्रतुंडा ! महाकाया ! कोटिसूर्यप्रकाशदा ! ।
निर्विघ्नता पूर्ण असो मम कार्यांत सर्वदा. ॥ १२ ॥

**कलशपूजन.**

कलशाच्या मुखीं विष्णु, कंठीं रुद्र समाश्रित, ।
मूळीं असे ब्रह्मदेव, मध्यीं मातृगण स्थित. ॥ १३ ॥
कुक्षीं समुद्र वसती, सप्तद्वीपा मही वसे, ।
ऋग्वेदप्रमुखां[३] वेदां वास तेथें सदा असे. ॥ १४ ॥
येथ गायत्री, सावित्री, शांतिही पुष्टिदायक, ।
येवोत देवपूजार्थ दुरितक्षयकारक[४]. ॥ १५ ॥
नर्मदे ! यमुने ! गंगे ! गोदे ! सिंधो ! सरस्वति ! ।
कावेरि ! या जलीं तुम्हां होवो ती सर्वदा स्थिति. ॥१६॥

'ह्या कलशाच्या ठायीं गंगादि नद्यांचें आवाहन करतों, वरुणाला

१ आरंभिलेल्या सर्व कामांत. २ ह्या प्रत्येक पूजनानंतर नमस्कार करावा. ३ ऋग्वेद आहे मुख्य ज्यांत अशा वेदांला. ४ पापांचा नाश करणाऱ्या.

नमस्कार असो, सर्व उपचारांकरितां गंधाक्षतपुष्पें अर्पण करतों असें नमस्कारपूर्वक म्हणावें, व तीं कलशाला लावावीं.

## शंखपूजन.

शंखमूळीं वसे चंद्र, पृष्ठीं राहे प्रजापती. ।
कुक्षींत वरुणा वास, अग्रीं गंगा सरस्वती. ॥ १७ ॥
सागरोत्पन्न तूं, तूतें विष्णूनें धरिलें करीं, ।
देवनिर्मित तूं शंखा ! प्रणाम तुजला करीं. ॥ १८ ॥

## घंटापूजन.

सुरांच्या आगमालागीं, असुरांच्या पलायना, ।
करीं घंटारवातें मी देवतांच्या निमंत्रणा. ॥ १९ ॥

## दीपपूजन.

तूं दीप मूल आधार, ज्योतींचा पति अव्यय, ।
पूजासमाप्तिपर्यंत राहें येथ सुनिश्चय. ॥ २० ॥

## प्रोक्षण.

अपवित्रा, पवित्रा कीं, असो कीं स्थिति कोणची, ।
स्मरे जो पुंडरीकाक्षा, बाह्याभ्यंतरिं तो शुची. ॥ २१ ॥

(कलशांतील उदक पूजाद्रव्यांवर व आपणांवर शिंपडावें. नंतर पूजनीय देवतांचें ध्यान करावें.)

## आवाहन.

येई तूं देवदेवेशा ! तेजोराशे ! जगत्पते ! ।
भक्तीनें पूजना केलें सुरसत्तम ! सेव तें. ॥ २२ ॥

१ पुराणोक्त पूजेंत बहुधा शंखपूजन नसतें. शंख, घंटा, दीप यांचे प्रत्येकाचे पूजनाचे श्लोक झाल्यावर त्या त्या देवतेस नमस्कार करून गंधाक्षतपुष्पें वहावीं. २ ब्रह्मदेव. ३ कुशींत. ४ शेवटीं, टोंकावर. ५ हातांत. ६ देवांनीं निर्माण केलेला. ७ नमस्कार करतों. ८ देव यावे म्हणून. ९ राक्षसांच्या. १० पळण्यासाठीं. ११ घंटेचा शब्द. १२ बोलावण्यासाठीं. १३ नाशरहित. १४ स्थिर. १५ शिंपडणें. १६ पुंडरीक कमलाप्रमाणें (शुभ्रवर्ण) डोळ्यांच्या विष्णूला. १७ आंतून व बाहेरून. १८ पवित्र. १९ बोलावणें. त्या उपचाराकरितां अक्षता वहाव्या. २० देवांमध्यें उत्तम, श्रेष्ठ अशा.

**आसन. ( वसंततिलका. )**

नानासुरत्नगणमंडित जें विराजे, ।
जें स्वर्णभूषणगुणींहि अपूर्व साजे; ॥
त्या आसना सुरवरा! तुज अर्पियेलें, ।
त्वां पाहिजे बसुनि त्यावरि धन्य केलें. ॥ २३ ॥

**पाद्य व अर्घ्य. ( अनुष्टुब् वृत्त. )**

पाद्या समर्पिलें देवा! तुज कल्याणहेतुला, ।
स्वीकारीं आदरें त्यातें, लोकनाथा! नमीं तुला. ॥ २४ ॥

नमितों देवदेवेशा! नमितों धरणीधरा! ।
नमितों जगदाधारा! अर्घ्यस्वीकार हा करा. ॥ २५ ॥
गंधपुष्पाक्षतीं युक्त फलद्रव्यसमन्वित, ।
परेशा! घेइं अर्घ्यार्थ तोय हें समुपाहृत. ॥ २६ ॥

**आचमन. ( इंद्रवज्रा. )**

मंदाकिनीचें जल आणियेलें, ।
कर्पूर घालोनि सुगंध केलें. ॥
तें अर्पिलें आचमनार्थ देवा! ।
सप्रेम त्यातें जगदीश! सेवा. ॥ २७ ॥

**स्नान.**

गंगा-सरस्वती-रेवा-पयोष्णी-नर्मदा-जलें, ।
आणूनि तुजला देवा! भक्तीनें थोर न्हाणिलें. ॥ २८ ॥

**पंचामृतस्नान.-दुग्ध.**

कामधेनुसमुद्भूत, देवांतें पितरांसि जें ।
दे तोष नित्य, दुग्धा त्या देवा! स्नानार्थ सेविजे. ॥२९॥

१ सोन्याच्या दागिन्यांनीं. २ देवश्रेष्ठा. ३ पाय धुण्याकरितां पाणी. ४ गंध, पुष्प, अक्षता व उदक. अर्घ्यापासून अभ्यंगस्नानापर्यंतचे सर्व विधींचे श्लोकांनंतर देवतेस ते ते उपचार अर्पण करावे. ५ देवा! ६ पाणी. ७ जवळ आणलेलें. ८ गंगेचें. ९ चांगल्या गंधानें युक्त. १० कामधेनूपासून उत्पन्न झालेलें. ११ घ्यावें.

या प्रत्येक स्नानानंतर शुद्धोदकस्नान व पूजोपचारार्थ अक्षता वहाव्या.

### दधि.

चंद्रमंडलसंकाशों[1], सर्वदेवमनःप्रियों[2], ।
अर्पितों दधितें ईशा! सेवावें आदरें तया. ॥ ३० ॥

### घृत.

आज्य आहार देवांचा, आज्य यज्ञीं प्रतिष्ठित[3], ।
स्नानार्थ घेई देवेशा! शुचि आज्य समर्पित. ॥ ३१ ॥

### मधु.

सर्वौषधिसमुत्पन्न[4], ऐसें मधु सुधेपरी[5], ।
स्नानार्थ अर्पितों तूतें, परमेश्वर! आदरीं. ॥ ३२ ॥

### शर्करा.

इक्षुदंडसमुद्भूत[6], शर्करेनें तुला हरे! ।
स्नान अर्पितसें भावें सेवावें त्यास आदरें. ॥ ३३ ॥

### गंधोदकस्नान.

एलाकर्पूरसंयुक्ता[7], सुगंधद्रव्यसंयुता, ।
गंधोदका सुखकरा सेवावें ईश! अर्पिता. ॥ ३४ ॥

### अभ्यंगस्नान.

अभ्यंगार्थ तुला देवा! देतसें पुष्पसंभव, ।
सुगंधद्रव्यसंयुक्त, तें सेवीं तैल तूं नव. ॥ ३५ ॥

अभ्यंगस्नानानंतर आचमन, चंदन, अलंकारार्थ अक्षता, पूजेकरितां पुष्पें, धूप, दीप, व नैवेद्याकरितां पंचामृताचें शेष किंवा शर्करा हीं अर्पण करावीं; व प्राणाय नमः, अपानाय०, व्यानाय०, उदानाय०, समानाय०, ब्रह्मणे नमः ह्मणून नैवेद्य दाखवावा. मध्येपानीय[8], उत्तरापोशन[9], हस्तप्रक्षालन, मुखप्रक्षालन यांकरितां उदक देऊन हस्तसुवासार्थ चंदन लावावें, फलाकरतां नारळ ठेवावा;

---

१ चंद्रमंडलासारख्या (शुभ्र). २ सर्व देवांच्या मनाला प्रिय. ३ स्थापन केलेलें. ४ सर्व वनस्पतींपासून झालेलें. ५ अमृताप्रमाणें. ६ उंसापासून झालेली. ७ एला=वेलची. ८ भोजनाच्या मध्यें घ्यावयाचें उदक. ९ भोजनानंतरचें घ्यावयाचें उदक.

मुखवासार्थ तांबूल द्यावें, सुवर्णदक्षिणा ठेवावी, मंत्रपुष्प वहावा, नमस्कार घालावा, निर्माल्य उत्तरेला टाकावा, अभिषेक करावा, व वस्त्रादि उपचार द्यावे.

### अभिषेक.

करोत अभिषेकातें ब्रह्मा, विष्णु, महेश्वर, ।
संकर्षण, जगन्नाथ, वासुदेव तुला, चिर[1]. ॥ ३६ ॥
अनिरुद्ध, इंद्र, अग्नी, भगवान् यम, निर्ऋति, ।
प्रद्युम्न सुखदा तूतें देवोत विजयस्थिति. ॥ ३७ ॥
देवता, वायु, वरुण, धनाध्यक्ष[2], सदाशिव[3], ।
ब्रह्मा, दिक्पालही तूतें वितरोत[4] सदा शिवं[5]. ॥ ३८ ॥
कीर्ति, लक्ष्मी, पुष्टि, धृती[6], मेधा[7], श्रद्धा, क्रियामति, ।
बुद्धि, लज्जा, वपु:शांति[8] होवोत सुखदा अति. ॥ ३९ ॥
कांति, तुष्टि[9], तशा सर्व मंगलार्थ सुरस्त्रिया[10], ।
माता येऊन तुजला अभिषेक करोत या. ॥ ४० ॥
आदित्य, सोम, तो भौम[11], बुध, जीव[12], तसा सित[13], ।
शनि, राहू, केतु, सारे तुजला अभिषेकुत. ॥ ४१ ॥
देव, दानव, गंधर्व, यक्ष, राक्षस, पन्नग[14], ।
देवमाता, देवपत्न्या, मुनि श्रेष्ठ, ऋषी, नग[15], ॥ ४२ ॥
धेनु, नाग, तसे दैत्य, अप्सरागण ते किती, ।
अस्त्रें, शस्त्रें, सर्व राजे, वाहनें ज्यां नसे मिती, ॥ ४३ ॥
औषधें, विविधें रत्नें, कालभाग समस्तही, ।
शैल, तीर्थें, नद्या नाना, तेवीं सागर जे महीं, ॥ ४४ ॥
नद, मेघहि सारे ते, सर्वकामार्थसिद्धिला[16] ।
करोत अभिषेकातें भक्तिभावें प्रभो! तुला. ॥ ४५ ॥

'शांति, पुष्टि, तुष्टि, असो' असें प्रार्थून आचमन द्यावें.

---

१ नेहमीं. २ कुबेर. ३ शंकर. ४ देवोत. ५ कल्याण. ६ धैर्य. ७ धारणाशक्ति. ८ शरीराचें स्वास्थ्य. ९ तृप्ती. १० देवस्त्रिया. ११ मंगळ. १२ गुरु. १३ शुक्र. १४ सर्प. १५ वृक्ष. १६ सर्व इच्छा तृप्त व्हाव्या म्हणून.

**वस्त्रोपवस्त्र. (इंद्रवज्रा.)**

देईन वस्त्र[1]द्वय हें तुम्हां कीं, ।
जें सर्व[2]भूषाधिक साच लोकीं. ॥
तें लोक[3]लज्जाहरणार्थ देवा! ।
भावें महा अर्पित आजि सेवा. ॥ ४६ ॥

**यज्ञोपवीत. (अनुष्टुब् वृत्त.)**

ब्रह्मसूत्रा[4] सोत्तरीया[5] पुरुषोत्तम! आदरीं, ।
देवदेवा नमीं तूतें, रक्ष या भवसागरीं[6]. ॥ ४७ ॥

**हरिद्रा[7].**

हरिद्रा हेमवर्णाभा[8], सर्वसौभाग्यदा सदा, ।
सर्वालंकारमुख्या जी सेवावी देवि! सौख्यदा. ॥ ४८ ॥

**कुंकुम.**

हरिद्राचूर्णसंयुक्ता, सर्वदा कामपूरणा[9], ।
अर्पितों कुंकुमा तूतें, सेवीं सौभाग्यवर्धना. ॥ ४९ ॥

**कज्जल[10].**

भो देवि! सर्वदा रम्या, कामिनीजन[11]सुप्रिया, ।
भूषणालागिं तूं सेवीं प्रेमानें कज्जलासि या. ॥ ५० ॥

**सिंदूर.**

सीमंतभूषणासाठीं उदितारुण[12]संनिभ, ।
स्वीकारीं देवि! सिंदूर जपापुष्प[13]समप्रभ. ॥ ५१ ॥

---

१ वस्त्रांची जोडी. २ सर्व भूषणांहून श्रेष्ठ. ३ लोकांपासून लज्जेचें संरक्षण व्हावें म्हणून. ४ यज्ञोपवीत. ५ अंगवस्त्रासह. ६ संसारसमुद्रांत. ७ हळद. येथपासून नालपत्रापर्यंतचे उपचार पूजनांत देवी असल्यास अर्पावयाचे. ८ सोन्याच्या वर्णासमान. ९ इच्छा पूर्ण करणाऱ्या. १० काजळ. ११ स्त्रियांना आवडणाऱ्या. १२ उदय पावलेल्या अरुणाप्रमाणें. १३ जास्वंदीच्या फुलाप्रमाणें.

**कंठसूत्र[1].**

मांगल्यतंतुमणिंनीं, मुक्ताफलिं विराजित, ।
भूषणाकारणें सेवीं कंठसूत्र समर्पित. ॥ ५२ ॥

**कंकणें.**

काचनिर्मित हीं दिव्यें कंकणें तूं सुरेश्वरि ! ।
हस्तालंकार ह्मणुनी प्रेमपूर्वक आदरीं. ॥ ५३ ॥

**अलंकार.**

अलंकार तुला देवि ! भक्तीनें हेम[2]निर्मित, ।
अर्पिले भूषणालागीं घेईजे प्रेमपूरित[3]. ॥ ५४ ॥

**तालपत्र[4].**

[5]नानाभरणशोभाढ्य, नानारत्नीं सुमंडित, ।
अर्पितों तुजला देवि ! तालपत्रें सुशोभित. ॥ ५५ ॥

**परिमलद्रव्यें.**

जगत्पते ! तुला प्रेमें नमीं त्रैलोक्यहेतुला, ।
[6]नानापरिमलद्रव्यें स्वीकारीं अर्पिलीं तुला. ॥ ५६ ॥

**चंदन.**

विलेपना[7] चंदनातें गंधाढ्य[8], सुमनोहर, ।
भक्तीनें अर्पिलें तूतें स्वीकारीं परमेश्वर. ॥ ५७ ॥

**अक्षता.**

अक्षता शुभ्र, विमल, कुंकुमीं सुविराजित, ।
स्वीकारीं प्रीतिनें थोर ईश्वरा ! या मदर्पित. ॥ ५८ ॥

**पुष्पें.**

सुगंधी मालती, माल्य, पुष्पें हीं पूजना प्रभो ! ।
अर्पिलीं तुजला सेवीं प्रेमपूर्वक ईश ! भो[9]. ॥ ५९ ॥

---

१ मंगळसूत्र. २ सोन्याचे. ३ प्रेमानें पूर्ण होऊन. ४ ताडपत्र (वारा घालण्याकरितां). ५ नाना प्रकारच्या अलंकारांनीं शोभलेलीं. ६ अनेक प्रकारचे सुगंधित पदार्थ. ७ आंगास लावण्यासाठीं. ८ गंधयुक्त. ९ अरे.

( वसंततिलका. )

सेवन्तिका, बकुल, चंपक, बिल्व, जाती, ।
पुन्नाग, आम्र, तुलसी, करवीरजाती, ॥
पद्म, प्रवाल, नव पाटल, अब्ज तेवीं, ।
त्या मालिकादि कुसुमीं तुज ईश सेवीं. ॥ ६० ॥

( अनुष्टुब् वृत्त. )

तुलसी-कुंद-मंदार-पारिजाताब्जपंचकीं ।
निर्मिता कथिती माला वैजयंती म्हणून कीं. ॥६१॥
त्र्यायुध[1], त्रिगुणाकार, त्रिदल, त्रिविलोचन[2], ।
त्रिजन्मपापसंहारा होवो बिल्व शिवार्पण. ॥ ६२ ॥

( वसंततिलका. )

पालाश, कुंद, करवीर, अशोक, कुब्ज, ।
सेवंति, चंपक, तसें शतपत्र अब्ज[3], ॥
जाती, त्रिसंध्य, कुशपुष्पक, मालती ती, ।
या मालिकाप्रमुख सुंदर पुष्पजाती. ॥ ६३ ॥

( अ. वृत्त. )

भृंगराज[4], अपामार्ग[5], शमीपत्रक, खदिर[6], ।
कुशपत्र, तशा दूर्वा ईश्वरा प्रियंकृत्तर[7]. ॥ ६४ ॥
बिल्व तें श्रेष्ठ यांहूनी, तुलसी श्रेष्ठ त्याहुनी, ।
शतपल्लव यांचे कीं देवातें प्रिय अर्चनीं. ॥ ६५ ॥
अगस्त्यवृक्षसंभूत[8] कुसुमीं असितीं सितीं[9] ।
अर्चुनी देवदेवातें पदं वैष्णवं[10] पावती. ॥ ६६ ॥

१ तीन आयुधांनीं युक्त. हें बिल्वपत्र शिवाला वहावें. २ तीन डोळ्यांचें. ३ कमळ. ४ माका. ५ आघाडा. ६ खैर. ७ अत्यंत आवडत्या. ८ अगस्त्याचे वृक्षाच्या. ९ काळ्या व पांढऱ्या. १० विष्णुलोक.

केतकी-तुलसी-माला विष्णुला प्रिय ती सदा ।
अर्पितां प्रीतिनें दे तो भक्तांतें सौख्यसंपदा. ॥ ६७ ॥

धूप. (वसंततिलका.)

नाना वनस्पतिरसीं निपजूनि साचा, ।
संतोपवी मन सदैव सुगंध ज्याचा; ॥
देवांस जो निजगुणीं बहु सेव्य झाला, ।
तो धूप थोर सुखवो तव मानसाला. ॥ ६८ ॥

दीप. (अ. वृत्त.)

देवेश! अर्पिला तूतें साज्यवर्तिक[1] दीप हा, ।
स्वीकारीं त्यास तूं प्रेमें त्रैलोक्यतिमिरापहा[2]! ॥ ६९ ॥
भक्तीनें अर्पिला दीप, दीपज्योति! नमो तुला, ।
घोर या नरकीं मग्ना[3], देवेशा! रक्ष तूं मला ॥ ७० ॥

नैवेद्य.

नाना हीं शर्कराखाद्यें दधिक्षीरघृतान्वित, ।
नैवेद्यालागिं तूं सेवीं भक्तिपूर्वक! अर्पित. ॥ ७१ ॥

'[4]प्राणाय नमः, अपानाय०, व्यानाय०, उदानाय०, समानाय०, ब्रह्मणे नमः' म्हणून नैवेद्य दाखवावा. मध्येपानीय, उत्तरापोशन, इत्यादिकांकरितां उदक द्यावें.

सुपारी व तांबूल[5].

नागवल्लीदलीं[6] युक्त दिव्य पूगीफला[7] नव ।
एलाकर्पूरगंधाढ्य[8] घे तांबूल दयार्णव[9]! ॥ ७२ ॥

---

१ तुपासह व वातीसह. २ त्रैलोक्यांतील अंधकाराचा नाश करणाऱ्या. ३ बुडलेल्याला. ४ प्राण, अपान, व्यान, उदान व समान, हे शरीरांत ठिकठिकाणीं अन्नरस व उदक पोंचविणारे वायूचे भेद आहेत म्हणून यांच्या एकेका नांवानें एकेक आहुती-ग्रास-समर्पण करावी. ५ विडा. ६ पानवेलीच्या पानानें युक्त. ७ सुपारी. ८ वेलची आणि कापूर यांच्या वासानें युक्त. ९ दयासमुद्रा!

### नारळ.

स्थापिलें फल भो ईशा! त्वदग्रीं प्रेमपूर्वक, ।
जन्मोजन्मीं फलावाप्ति[1] हो मनोरथपूरक. ॥ ७३ ॥
फलें या सार्थका आलें त्रैलोक्य सचराचर, ।
फलप्रदानें[2] इष्टार्थसिद्धि[3] होवो सुरेश्वर! ॥ ७४ ॥

### दक्षिणा.

अनंतपुण्यफलद[4] अग्निबीजें[5][6] सुवर्ण तें, ।
दक्षिणार्थ तुला अर्पीं ईशा! दे मज शांतितें. ॥ ७५ ॥

### नीराजन. (इंद्रवज्रा.)

आहेस तूं चंद्र, रवीहि तूंच, ।
तूं विद्युदग्नी, धरणी तसाच, ॥
तेजें समस्तें असती तुझींच, ।
सेवीं सुखें आरति ईश! साच. ॥ ७६ ॥

आरती[7] ओंवाळावी.

### कर्पूर.

कर्पूरदीपा सुमनोहरा या ।
प्रेमें समर्पीं जगदेकराया; ॥
देवासुरीं संस्तुत[8] नित्य ईशा! ।
दीनीं करीं प्रेम जगन्निवासा! ॥ ७७ ॥

(उपजाति.)

कर्पूरगौरा! करुणावतारा! ।
संसारसारा! भुजगेंद्रहारा! ॥
सदा रहासी हृदयारविंदीं[9] ।
भवा[10]! भवानीसह[11] तूज वंदीं. ॥ ७८ ॥

---

१ फलप्राप्ति. २ फलदानानें. ३ वांछितफलप्राप्ति. ४ पुष्कळ पुण्यरूपी फळ देणारें. ५ अग्नीपासून झालेलें. ६ बीज व अग्नि. ७ येथें त्या त्या देवतेची आरती म्हणावी. ८ स्तुति केलेल्या. ९ हृदयरूप कमलामध्यें. १० हे शंकरा. ११ पार्वतीसह.

(वसंततिलका.)

कर्पूर दे परम मोदें[1] मना सुवासें, ।
शोभा वरी रुचिर कांचनपात्रवासें[2]. ॥
उद्दीप्त होउनि मनोहर तेज जें[3] वी, ।
तेणें करीन तुज आरति ईश! सेवीं. ॥ ७९ ॥

नमस्कार. (शालिनी.)

सर्वांतें तूं एक कल्याणदाता, ।
विश्वा[4]चाही एक आधारताता! ॥
केला तूतें थोर यत्नें सुभावें, ।
अष्टांगांहीं म्यां नमस्कार, पावें. ॥ ८० ॥

(वंशस्थ.)

वचें[5], उरें, दृष्टिगुणें, तसेंच कीं, ।
करद्वयें, जानु[6]युगेंहि, मस्तकीं, ॥
तसाच जो पादयुगें, मनोगती, ।
प्रणाम अष्टांग तयास बोलती. ॥ ८१ ॥

नमीं अनंतासि सहस्रमूर्तिला, ।
सहस्र[7]पादाक्षिशिरोरुबाहुला, ॥
सहस्रनामांकित शाश्वता नमीं, ।
सहस्रकोटी[8]युगधारकासि मी. ॥ ८२ ॥

प्रदक्षिणा[9]. (वसंततिलका.)

पापें करीं[10] किति मदीय इथें जहालीं, ।
जन्मांतरीं[11] तशिंच म्यां अति घोर केलीं; ॥

---

१ आनंद. २ सोन्याच्या भांड्यांत असल्यानें. ३ उत्पन्न करतो. ४ जगाचा. ५ वाणीनें. ६ गुडघ्यांनीं. ७ हजार पाय, हजार डोळे, हजार शिरें, हजार भांड्या, व हजार हात यांनीं युक्त अशा. ८ कोट्यवधि युगें धारण करणाराला. ९ चंडी देवीचें पूजन असल्यास एक प्रदक्षिणा, सूर्याचें असल्यास सात, गणपतीचें असल्यास तीन, विष्णूचें असल्यास चार, शंकराचें असल्यास अर्धी प्रदक्षिणा. १० माझ्या हातून. ११ अन्यजन्मीं.

तीं तीं प्रदक्षिणपदीं[1] मम सर्व खास ।
जातील सर्व विलयासि जगन्निवास! ॥ ८३ ॥

(इंद्रवंशा.)

त्राता[2] तुझ्यावीण न अन्य बा मला, ।
मातें सदा तूंच शरण्य[3] एकला. ॥
पायीं तुझ्या संतत देइं आसरा, ।
कारुण्यभावें[4] मज रक्ष ईश्वरा! ॥ ८४ ॥

**मंत्रपुष्पांजलि.** (मालिनी.)

कर[5], पद, तनु[6], यांहीं जाहलें पाप साच, ।
श्रुति-नयन-ज[7] जो कीं दोष झाला तसाच. ॥
विहित, अविहितातें त्वां क्षमावें स्वभावें, ।
जय जय करुणाब्धे! वंदितों सर्वभावें. ॥ ८५ ॥

**प्रार्थना.** (इंद्रवंशा.)

जाणें न आवाहन वा विसर्जन ।
पूजा न जाणें तव बा जनार्दन! ॥
जाणें न कांहीं तुजवीण मी हरी! ।
अन्याय सारे मम तूं क्षमा करीं. ॥ ८६ ॥

(वसंततिलका.)

गेलेंच पाप, मम दुःखहि सर्व गेलें, ।
दारिद्र्य सर्वहि तुवां विलयासि[8] नेलें. ॥
संपत्ति, सौख्य सगळें क्षणिं येत हातां, ।
कारुण्यसागर[9] तुला नयनीं पहातां ॥ ८७ ॥

---

१ प्रत्येक प्रदक्षिणेला. २ रक्षण करणारा. ३ शरण जाण्यास योग्य. ४ करुणेनें. ५ हात. ६ शरीर. ७ कानांकडून किंवा डोळ्यांकडून घडलेला. ८ शेवटाला, नाशाला. ९ करुणासमुद्र, दयेचा समुद्र.

(अनुष्टुब् वृत्त.)

मंत्रहीन, क्रियाहीन, भक्तिहीन असें तरी, ।
पूजा ही आदरें सेवीं, पूर्ण मानोनि अंतरीं. ॥ ८८ ॥
अपराधसहस्रें जीं प्रत्यहीं[1] घडती करीं ।
दास मानूनि पायांचा परमेशा! क्षमा करीं. ॥ ८९ ॥
रूपा देईं, जया देईं, यशा देईं, वधीं अरी[2] ।
सौभाग्य दे, सुतांतें दे, पूर्णकाम मला करीं. ॥ ९० ॥

नमन.

जयाच्या स्मृतिनें, नामें, पूजायज्ञादिकीं[3] सदा ।
न्यून संपूर्णते ये, त्या अच्युताच्या नमीं पदा. ॥ ९१ ॥

'ह्या यथाशक्ति व ज्ञानानुसार केलेल्या पूजनानें ईश्वर (ज्या देवाचें किंवा देवतेचें पूजन असेल तो किंवा ती) संतुष्ट होवो' असें प्रार्थावें. नंतर ब्राह्मणाला वायनदान द्यावें, त्याचें पूजन करावें व ब्राह्मण महाविष्णुस्वरूप आहे असें समजून त्यास आसन द्यावें.

ब्राह्मणपूजा.—पाद्य.

तीर्थ पादोदक तुझें, त्वन्मुखीं वेद राहिले, ।
भूमिदेवा[4]! नमीं तूतें, घेईं पाद्यास अर्पिले. ॥ ९२ ॥

अर्घ्य.

भूमिदेवा! तुला मानीं मूर्त कीं पुरुषोत्तम, ।
प्रत्यक्ष यज्ञपुरुष, सेविजे अर्घ्य उत्तम. ॥ ९३ ॥

वायनदान. (उपेंद्रवज्रा.)

श्रुतिज्ञ[5] तूं, श्रोत्रिय[6] तूंच साच, ।
सुविप्र, तेंवी कुलवान् तसाच; ॥
संतोष व्हायासि जनार्दनातें ।
उपायना[7] देत तुला द्विजातें. ॥ ९४ ॥

---

१ प्रतिदिवशीं. २ शत्रू. ३ पूजा, यज्ञ इत्यादिकांनीं. ४ ब्राह्मणा! ५ वेदज्ञ. ६ अग्निहोत्री. ७ वायन.

( अनु० वृत्त. )

नरकोत्तारणालागीं[1], व्रत संपूर्ण व्हावया, ।
वायना द्विजवर्यातें[2] देतसें या हिरण्मया[3]. ॥ ९५ ॥

'अनंतपुण्यफलद' श्लो. ७५ वा म्हणून ब्राह्मणास दक्षिणा द्यावी.

### आशीर्वाद.

कल्याणकृत्[4] तुला ब्रह्मा, तेवीं ते विप्र सर्वदा, ।
सर्पादि जंतुंची[5] पीडा होवो न तुजला कदा. ॥ ९६ ॥
ययाति, तेंवि नहुष, धुंधुमार, भगीरथ, ।
राजर्षी सर्व तुजला दावोत स्वस्तिचा[6] पथ. ॥ ९७ ॥
क्षेम द्विपाद करुत, चतुष्पाद, अपाद[7]ही ।
कोणापासूनि तुजला विघ्नबाधा नसो महीं. ॥ ९८ ॥
स्वाहा[8], स्वधा, शची[9], होवो स्वस्तिकारक सर्वदा, ।
लक्ष्मी, अरुंधती, त्याही होवोत तुज सौख्यदा. ॥ ९९ ॥
अंगिरा, देवल, तसा विश्वामित्र मुनीश्वर, ।
असितर्षी, कार्तिकेय, होवोत सुखकृत् चिरं[10]. ॥ १०० ॥
विवस्वान्[11] भगवान् तूतें होवो कल्याणकृत् सदा, ।
दिङ्नाग, भू नभ[12] तुला देवोत सुखसंपदा. ॥ १०१ ॥

### विसर्जन.

पूजा स्वीकारुनी देवगण हा गमना करो, ।
इष्टकामसमाप्त्यर्थ पुनरागमना वरो. ॥ १०२ ॥

### तीर्थ घेणें.

अकालमृत्यु जें वारी, सर्व व्याधींस संहरी, ।
विष्णुपादोदका तीर्था प्रेमें मी जठरीं धरीं. ॥ १०३ ॥

---

१ नरकांतून तरून जाण्याकरितां. २ ब्राह्मणश्रेष्ठाला. ३ सोन्याच्या. ४ कल्याण करणारा. ५ जीवांची. ६ कल्याणाचा मार्ग. ७ सर्प वगैरे. ८ अग्नीच्या स्त्रिया. या देवता आहेत. ९ इंद्राणी. १० नेहमीं. ११ सूर्य. १२ आकाश.